**शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथील लोकनेते बाळासाहेब देसाई अध्यासन केंद्रास निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: केएसयु-२०१५/प्र.क्र.४२/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२.

<u>**संदर्भ क्र**</u> :- १) समक्रमांकाचा दि.१४.०५.२०२१ रोजीचा शासन निर्णय.
२) दि.१६.०२.२०२२ रोजीची मा.मंत्रीमंडळाची बैठक.

**शासन निर्णय :-**

लोकनेते बाळासाहेब देसाई हे एक लोकोत्तर व्यक्तिमत्व होते. आधुनिक महाराष्ट्राच्या जडणघडणीमध्ये त्यांचा सिंहाचा वाटा होता. स्वातंत्र्यपूर्व काळामध्ये सातारा जिल्हा लोकल बोर्डाचे अध्यक्ष ते महाराष्ट्र राज्याचे बांधकाममंत्री, शिक्षणमंत्री, कृषिमंत्री, महसूलमंत्री व गृहमंत्री इ. पदांवर विराजमान झालेल्या बाळासाहेबांनी हातात आलेल्या सत्तेचा वापर अविरतपणे लोककल्याणासाठी केला, आणि आपल्या प्रशासकीय कौशल्याचा वेगळा ठसा महाराष्ट्राच्या राजकारणावर उमटवला. त्याचबरोबर शिवाजी विद्यापीठाच्या स्थापनेमध्येही त्यांची भूमिका अत्यंत महत्त्वाची राहिली. इतकेच नव्हे तर तमाशा, नाट्य, चित्रपट, मल्लविद्या इ. क्षेत्रातही त्यांनी भरीव कामगिरी केली. राजकीय, सामाजिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक क्षेत्रातले लोकनेते बाळासाहेब देसाई यांचे कार्य पाहता त्यांना आधुनिक महाराष्ट्राचे शिल्पकार म्हटले तर उचित ठरेल. म्हणूनच त्यांच्या या अतुलनीय कार्याला उजाळा देण्याच्या उद्देशाने महाराष्ट्र शासनाने त्यांच्या नावाने अध्यासन उभारण्यास मान्यता देऊन त्यांच्या कार्यावर व विचारांवर संशोधन करण्याची संधी विद्यापीठाला उपलब्ध करुन दिली आहे.

त्यानुसार शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथे लोकनेते बाळासाहेब देसाई अध्यासन केंद्र स्थापन करण्याकरिता आवश्यक असणारी इमारत, साहित्य या अनावर्ती खर्चाबाबतच्या सविस्तर तपशीलासह प्रस्ताव विद्यापीठाने शासनास सादर केला होता. त्यानुसार शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथे लोकनेते बाळासाहेब देसाई अध्यासन केंद्र स्थापन करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच अध्यासन केंद्र निर्माण करण्यासंदर्भात तयार करण्यात आलेल्या धोरणास संदर्भ क्र.२ येथील मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत सहमती देण्यात आली आहे. त्यानुसार सदर केंद्राकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

लोकनेते बाळासाहेब देसाई अध्यासन केंद्रास रु.३६,७५,०००/- (अक्षरी रुपये छत्तीस लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

१. सदर केंद्राकरिता कोणतेही नविन पद तयार करता येणार नाही या केंद्राकरिता लागणारे मनुष्यबळ विद्यापीठाच्या आकृतीबंधातून उपलब्ध करुन द्यावयाचे आहे.
२. शासनाकडून उपलब्ध होणारे अनुदान राष्ट्रीयकृत बँकेच्या नियतठेवीत गुंतवण्यात येईल आणि या रक्कमेतून प्राप्त होणारी व्याजाची रक्कम अध्यासनाच्या कामकाजासाठी उपयोगात आणली जाईल.
३. विद्यापीठास कोणताही अधिकचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही.विद्यापीठास लागणारा अधिकचा निधी विद्यापीठाने स्वनिधीतुन उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.
४. अध्यासनाचा महसूल नियत ठेवींवर मिळालेल्या व्याजातून उभारला जाईल. अध्यासनासाठी चालविण्यात येणा-या पाठयक्रमांतील शुल्क आणि प्रशिक्षण कार्यक्रम व सल्ला/समुपदेशन प्रकल्प चालविण्यातून निर्माण झालेले उत्पन्न यांमधून निर्माण केलेल्या महसुलाद्वारे यात भर घालण्यात येईल.

५. अध्यासनासाठी झालेल्या खर्चाची माहिती वेळोवेळी संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करण्याची जबाबदारी विद्यापीठाची राहील.
६. दर २ वर्षानी प्रत्येक अध्यासन केंद्राचे परिक्षण करण्यात येईल व यासंदर्भातील अहवाल संचालक, उच्च शिक्षण पुणे यांचेमार्फत शासनास सादर करण्यात येईल. सदर अहवालात अध्यासनाची गुणवत्ता, संशोधनात्मक केलली कामगिरी, विद्यार्थी संख्या, आयोजित केले जाणारे उदबोधन वर्ग आणि प्रशिक्षण वर्ग याबाबत अध्यासन केंद्रांची नकारात्मक प्रगती असल्यास सदरचे अध्यासन केंद्र बंद करण्यात येईल व अध्यासन केंद्राकडे असलेला निधी शासनाकडे वर्ग करणे विद्यापीठास बंधनकारक असेल.

२. सदरहू मंजूर झालेला निधी शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ प्रधानशिर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (२६) कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठाचा विकास (२२०२ एच ८१२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२१, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१ अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७८/२०२२/व्यय-५,दि.२४.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४०११२५५२९७८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2022.04.01 12:58:34 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
४. कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
५. कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे/ कोल्हापूर
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ कोल्हापूर.
१०. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई
११. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३. उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४. नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१५. वित्त विभाग, (व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१६. कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, उपरोक्त वितरीत करण्यात आलेला निधी तात्काळ BDS प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात यावा.
१७. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.